मुंबई शहरामध्ये स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाचे **Vertical University Campus** स्थापन करण्यासाठी समिती गठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०१७/(१४४/१७)/विशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई : ४०००३२.
दिनांक : २७ फेब्रुवारी, २०२०.

<u>संदर्भ</u> :- शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१७/(१४४/१७)/विशि-४, दिनांक १९ जानेवारी, २०१९.

<u>प्रस्तावना</u> :-

राज्यात स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांची स्थापना करण्यासंदर्भात निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक सूचनांमध्ये सुधारणा करण्यासाठी दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्री.अरुण बोंगिरवार, माजी मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली द्विसदस्यीय समितीची स्थापना करण्यात आली होती. सदर समितीच्या काही शिफारशींचा स्विकार करुन मंत्रिमंडळाच्या मान्यतेने संदर्भाधिन शासन निर्णयान्वये सुधारित मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर मार्गदर्शक सूचनांमध्ये Vertical University Campus बाबत तरतूद नाही.

तथापि, मुंबई शहरातील विविध प्रायोजक मंडळांकडून स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ (Vertical University Campus) सुरु करण्याची मागणी प्राप्त होत असल्याने, ते स्थापन करण्यासंदर्भात निकष निश्चित करण्यासाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>**शासन निर्णय :-**</u>

मुंबई शहरामध्ये स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठ (Vertical University Campus) स्थापन करण्यासंदर्भात निकष निश्चित करुन त्याबाबतचा स्वयंस्पष्ट अहवाल शासनास सादर करण्यासाठी खालील समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | श्री.जयंत बांठीया, माजी मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २ | श्री.राजन वेळूकर, माजी कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई | सदस्य |
| ३ | डॉ.विजय खोले, माजी कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई | सदस्य |
| ४ | सह सचिव, विद्यापीठ अनुदान आयोग, पुणे | सदस्य |
| ५ | श्री.डी.पी. गोमारे, सेवानिवृत्त सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६ | सह सचिव / उप सचिव (विद्यापीठ शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग | निमंत्रक |

२. **उपरोक्त समिती खालील बाबींचा सर्वंकष विचार करुन शासनास अहवाल सादर करेल:-**

- Vertical University Campus सुरु करावयाच्या इमारतीमध्ये फक्त विद्यापीठाचेच कामकाज करता येईल (Single Campus) की अन्य खाजगी कंपनींची कार्यालय चालू असतील (उदा. खाजगी बँका, उद्योजकाचे कार्यालय इ.) तर ती सुरु ठेवणे विद्यार्थ्यांचे शैक्षणिक हित विचारात घेता उचित ठरेल किंवा कसे.

- मुंबई शहरातील लोकसंख्येची घनता व उपलब्ध पायाभूत सुविधा विचारात घेऊन Vertical University Campus ची मर्यादा निश्चित करण्याची आवश्यकता.
- राज्यातील मुंबई शहरातील शिक्षणाचा दर्जा सुधारण्यासाठी स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाच्या Vertical University Campus ची स्थापना करणे उचित ठरेल किंवा कसे, त्यादृष्टीने उपाययोजना करण्यासाठी बदल सुचविणे.
- एखादे प्रायोजक मंडळ Brown field शी संबंधित प्रचलित निकष पूर्ण करीत नसेल तर अशा प्रायोजक मंडळास Vertical University Campus सुरु करण्यास मान्यता देणे योग्य ठरेल किंवा कसे.
- UGC (Establishment of and maintenance of standards in Private Universities) Regulations, 2003 च्या प्रचलित तरतुदीनुसार Vertical University Campus सुरु करणे योग्य ठरेल किंवा कसे.
- Vertical University Campus संदर्भात विद्यापीठ अनुदान आयोगाकडून मार्गदर्शक सूचना प्राप्त करणे आवश्यक वाटल्यास त्या नेमक्या कोणत्या बाबीसंदर्भात असाव्यात.
- Vertical University Campus स्थापन करण्यासाठी विद्यार्थ्यांची संख्या नेमकी किती असावी.
- अन्य देशात कार्यरत असलेल्या Vertical University Campus विषयक सोयीसुविधा व अन्य शैक्षणिक बाबींचा तुलनात्मक अभ्यास करून शिफारशी करणे.
- विद्यापीठ अनुदान आयोगाने अन्य राज्यांत Vertical University Campus स्थापन करण्यासाठी मान्यता दिली असल्यास, तेच निकष मुंबई शहरात Vertical University Campus स्थापन करण्यासाठी लागू करणे योग्य राहिल किंवा कसे.
- वरील मुद्दयांव्यतिरीक्त अन्य काही महत्वाचे मुद्दे आवश्यक वाटल्यास त्यांच्या आधारे शिफारशी करणे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००२२७१४४०३६०८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sameer Laxman Dhere

Digitally signed by Sameer Laxman Dhere
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e6ab4a357b0e2247b4328b57f45f509bf1bf0bd20c865128a018421c354bddc5, serialNumber=6ee64cf9b42881125c3715a5db341b5827c5743c728bc85f04bb71ff8fc154d6, cn=Sameer Laxman Dhere
Date: 2020.02.27 14:45:39 +05'30'

**( समीर ढेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. श्री.जयंत बांठीया, माजी मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य
४. श्री.राजन वेळूकर, माजी कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई
५. डॉ.विजय खोले, माजी कुलगुरु, मुंबई विद्यापीठ, मुंबई
६. सह सचिव, विद्यापीठ अनुदान आयोग, पुणे
७. श्री.डी.पी. गोमारे, सेवानिवृत्त सह सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सह सचिव / उप सचिव (विद्यापीठ शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग
९. सचिव(उवतंशि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.निवडनस्ती(विशि-४)